**विभागीय संवर्ग बदलून देण्याबाबत**
**श्रीमती सीमा द्वारकादास रांगडे,**
**अधिक्षक, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बदली-३११९/प्र. क्र.५२/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ३१ जुलै, २०२०

वाचा:-

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या-१२, दिनांक २८ एप्रिल, २०१५

२. शासन आदेश क्रमांक : निसूची-३६१७/प्र.क्र.८८, प्रशा-२, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१८

**शासन आदेश**-

श्रीमती सीमा द्वारकादास रांगडे, अधीक्षक, सामान्य राज्य सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) या पदावरून अधीक्षक, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) या संवर्गात दिनांक १७ फेब्रुवारी, २०१८ रोजी पदोन्नती देण्यात आली होती. श्रीमती. सीमा रांगडे यांना नागपूर मसहुली विभागात अधीक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक (प्राथमिक), जिल्हा परिषद गोंदिया या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली. श्रीमती सीमा रांगडे यांनी वडीलांना ह्दयविकाराचा त्रास असल्यामुळे सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना दिनांक २८.०४.२०१५ रोजीच्या महसूल विभाग वाटप नियमामध्ये मुद्दा क्रमांक १२ मधील अटीनुसार नागपूर महसूल विभागात १ वर्षाचा कालावधी पूर्ण झाल असल्याने विभाग संवर्ग बदल करून पुणे महसूल विभागात पुणे जिल्ह्यात पदस्थापना देण्याची विनंती केली आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २८.०४.२०१५ रोजीच्या अधिसूचनेमधील नियम १२ मधील तरतुदीनुसार वाटप करण्यात आलेल्या विभागात किमान एक वर्ष सेवा पूर्ण केल्यानंतरच नमूद केलेल्या कारणास्तव संबंधित अधिकाऱ्यांस दुसरा महसुली विभाग बदलून देता येतो. सदर अधिकाऱ्यांच्या विनंतीच्या अनुषंगाने महसुल विभाग बदलून पदस्थापना देण्यासाठी त्यांचा विनंती अर्ज नागरी सेवा मंडळाच्या बैठकीत ठेवण्यात आला होता. नागरी सेवा मंडळाच्या शिफारशीस सक्षम प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या पूर्वमान्यतेनुसार पुणे महसूल विभागास स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविलेल्या पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याच्या पदावर रूजू झाल्याचा दिनांक | वाटप केलेला महसुली विभाग | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतरचा विभाग व जिल्हा | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | महसूली विभाग | जिल्हा |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) |
| १. | श्रीमती सीमा द्वारकादास रांगडे, अधीक्षक | २६.०३.२०१८ | नागपूर | अधीक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक (प्राथ.) जि.प. गोंदिया | पुणे | अधीक्षक, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे |

३. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्विकारावा. तसेच आयुक्त (शिक्षण), पुणे यांनी संदर्भाधीन आदेशात नमूद केल्याप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होतील याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०२००७३११६५१११७९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6cd30ed620a4fe01f24cb84cc86e70f3b8f6f1fdcdb2469570c78dabb9acf4ba, postalCode=400032, street=ROOM NO 4.4,ANNEX BLDG,SCHOOL EDUCATION DEPT.MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2020.07.31 17:15:55 +05'30'

**(दीपक शेलार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण,महाराष्ट्र राज्य,पुणे
२. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
३. सर्व शिक्षण संचालक
४. संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक
५. संबंधित लेखा व कोषागार अधिकारी
६. संबंधित अधिकारी (शिक्षण आयुक्तालयामार्फत)

**प्रत माहितीस्तव :-**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३. निवडनस्ती/ प्रशा-२ कार्यासन